**वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेमध्ये दलित वस्ती सुधारणा योजनेच्या धर्तीवर तांडा/वस्ती सुधार योजना सुधारित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग,**
**शासन शुध्दीपत्रक क्र. तांसुयो-२०१७/प्रक्र-८४/विजाभज-१,**
हुतात्मा राजगुरु चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक- १९ जानेवारी, २०१९

**संदर्भ:-** शासन निर्णय क्रमांक- तांसुयो-२०१७/प्रक्र-८४/विजाभज-१, दि.३० जानेवारी, २०१८.

**शासन शुध्दीपत्रक:-**

संदर्भाधीन शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट-अ मधील अ.क्र.१ येथे नमूद "ग्रामीण भागात खालील पायाभूत सुविधापुढे दर्शविलेल्या अग्रक्रमाने देण्यात याव्यात :-१.विद्युतीकरण, २.. पिण्याचेपाणी, ३. अंतर्गतरस्ते, ४. गटारे, ५. शौचालये तसेच समाजमंदीर/ वाचनालय व शक्य असेल तेथे मुख्य रस्त्याला जोडणाऱ्या रस्त्यांची कामे." **या ऐवजी** "ग्रामीण भागात खालील पायाभूत सुविधा पुढे दर्शविलेल्या अग्रक्रमाने देण्यात याव्यात :- १.विद्युतीकरण (हायमॅक्स/पथदिवे/एलइडी बसविणे), २. पिण्याचे पाणी ३. अंतर्गत रस्ते,४. गटारे, ५. शौचालये तसेच समाजमंदीर/ वाचनालय व शक्य असेल तेथे मुख्य रस्त्याला जोडणाऱ्या रस्त्यांची कामे.", असे वाचण्यात यावे.

२. तसेच सदर शासन शुध्दीपत्रकान्वये संदर्भाधीन शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या परिशिष्ट-अ मध्ये अ.क्र. ८ नंतर अ.क्र. ९ पुढीलप्रमाणे समाविष्ट करण्यात येत आहे.

| अ.क्र. | मुद्दा | बदल |
|---|---|---|
| ९ | ग्रामपंचायतीने सादर करावयाचे ठराव | संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांनी वसंतराव नाईक तांडा/वस्ती सुधार योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामांचा प्रस्ताव ग्रामपंचायतीकडून मागवितांना "ग्रामपंचायतीकडून प्रस्तावित करण्यात आलेली कामे अन्य कोणत्याही योजनेतून मंजूर करण्यात आलेली नाही." तसेच "तांडा/वस्ती सुधार योजनातून मंजूर करण्यात आलेली कामांची देखभाल व दुरुस्ती संबंधित ग्रामपंचायतीने ग्रामपंचायतीच्या निधीतून करावी.",अशा आशयाचे ग्रामपंचायतीचे ठराव प्रस्तावासोबत घेण्यात यावेत. |

३. सदरहू शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०१९०११९१७०६५९८२२२ असा आहे. सदर शासन शुध्दीपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Bhaurao Raghunath Gavit

Digitally signed by Bhaurao Raghunath Gavit
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=VJNT OBCS SBC Welfare Dept., postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=692454783803b1bf08be0ff2505a01eb578c61edfbb827457be5704f5b440067, serialNumber=950bc6a64b0801087d4b403d7351619557bcd3489ca14b4e0f644bf05a04e89c, cn=Bhaurao Raghunath Gavit
Date: 2019.01.19 17:17:16 +05'30'

**( भा. र. गावित )**

सह सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१. मा.राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे अ.मु.स.
३. मा.मंत्री/राज्यमंत्री, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण यांचे खाजगी सचिव
४. विरोधी पक्षनेता (विधासभा/विधानपरिषद)
५. संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याणसंचालनालय, पुणे
६. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
७. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई
८. प्रधान सचिव,गृहनिर्माण विभाग,मंत्रालय,मुंबई
९. उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,मुंबई
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व प्रादेशिक उपआयुक्त,समाजकल्याण विभाग
१२. सर्व सहायक आयुक्त,समाजकल्याण विभाग
१३. सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी
१४. महालेखापाल महाराष्ट्र १ /२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
१५. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई
१६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८. लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा , मुंबई
१९. सर्व सहसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागास प्रवर्ग कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सहसचिव(अर्थसंकल्प), सामाजिक न्याय विभाग,मंत्रालय,मुंबई
२१. निवडनस्ती/विजाभज-१